GR- 20040805124658001-1201

ग्राम पंचायतीच्या कामाचे प्राकलन उपलब्ध
करून देणे व ते मराठीत असणेबाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक झेडपीए २००१/प्र.क्र.१०५/वित्त-९
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२ दिनांक ६ जानेवारी २००४

परिपत्रक

एखाद्या ग्राम पंचायतीच्या कार्यक्षेत्रात एखादे काम घ्यावयाचे असेल तर त्या ग्राम पंचायतीला ते काम घेण्याबाबत विचारणा करावी असे अभिप्रेत होते. परंतु शासनाच्या असे निदर्शनास आणून देण्यात आले आहे की,ग्राम पंचायतीला, सरपंचाना किंवा सदस्यांना ग्राम पंचायतीच्या हद्दीत कोणती कामे घेण्यात येणार आहेत याबाबतची माहिती होत नाही. काम पूर्ण झाल्यावरही पूर्ण झाल्याचे कळविले जात नाही. तसेच सदर कामाचे प्राकलन उपलब्ध करून न दिल्याने कामाची आवश्यकता किंवा दर्जा याबाबत तपासणी करता येत नाही. पर्यायाने अनावश्यक काम किंवा निकृष्ठ काम याबाबत शासनावर भूर्दंड बसण्याची शक्यता निर्माण होते. हे सर्व लक्षात घेवून शासन खालील प्रमाणे निर्णय देत आहे.

शासनाच्या निरनिराळ्या विभागाकडील योजनेतंर्गतची विकास कामे ग्राम पंचायतीकडे सुपूर्द करतांना संबंधित ग्राम पंचायतीला कळविण्यात यावे. तसेच त्या कामाची प्राकलनेहि मराठीत उपलब्ध करून द्यावीत. या सूचनांचे सर्व संबंधितांनी काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( जयश्री चौधरी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
३. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
४. सर्व कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद,
५. सर्व कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद,
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
७. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नाशिक,पुणे, नागपूर, औरंगाबाद, अमरावती,
८. सर्व जिल्हा स्थानिक निधी लेखा अधिकारी,
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०.महालेखापाल, (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
११. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२.महालेखापाल, (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१३.सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमा-२),
१४.पाटबंधारे विभाग,
१५.इतर सर्व मंत्रालयीन विभाग,
१६.ग्राम विकास विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने,
१७.निवड नस्ती.